वरिष्ठ राज्य गुणवत्ता निरिक्षक (SSQM) व राज्य गुणवत्ता निरिक्षक, श्रेणी-२ (SQM-II) यांच्या वयोमर्यादेत बदल करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः ग्रासयो-२०२३/प्र.क्र.१९६/बांधकाम-२**
**बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ००१**
तारीख: २७ जुलै, २०२३

**वाचा:-**

१) ग्राम विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः क्र.जिपर-२०१२/प्र.क्र.१६४/योजना-९, दिनांक ३० ऑक्टोबर,२०१२.
२) ग्राम विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः ग्रासयो-२०१५/प्र.क्र.१२/योजना-९, दिनांक २८ ऑक्टोबर, २०१५.
३) ग्राम विकास विभाग शासन परिपत्रक क्र.मुग्रायो-२०१७/प्र.क्र.१५४/पंरा-७, दिनांक ०७.१०.२०१७.
४) राज्य गुणवत्ता समन्वयक, प्रमंग्रासयो, पुणे यांचे पत्र क्र.जा.क्र./ प्रमंग्रासयो /३६५/२०२३, दिनांक ३१.०३.२०२३

**प्रस्तावना:-**

प्रधानमंत्री ग्राम सडक योजनेच्या मार्गदर्शक सुचनास अनुसरून त्रिस्तरीय गुणवत्ता कार्यपध्दती अवलंबिण्यात आली आहे. यानुसार संदर्भ क्र.१ येथील प्रधानमंत्री ग्राम सडक योजनेंतर्गत बांधण्यात येणाऱ्या रस्त्यांच्या गुणवत्ता तपासणीसाठी स्तर-I क्षेत्रीय स्तरावरील कार्यरत अभियंता, स्तर- II राज्य गुणवत्ता निरिक्षक (SQM Gr-I) (सेवानिवृत्त अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता) व स्तर-३ राष्ट्रीय गुणवत्ता निरीक्षक (NQM) यांच्यामार्फत कामाची गुणवत्ता तपासण्यात येते. प्रधानमंत्री ग्राम सडक योजनेच्या धर्तीवर संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय दि.२८.१०.२०१५ अन्वये मुख्यमंत्री ग्राम सडक योजना सुरू करण्यात आली आहे. संदर्भ क्र. ३ नुसार प्रधानमंत्री ग्राम सडक योजनेच्या धर्तीवर मुख्यमंत्री ग्राम सडक योजनेअंतर्गत बांधण्यात येणाऱ्या रस्त्यांच्या गुणवत्ता तपासणीसाठी १. कार्यकारी अभियंता (प्रमंग्रासयो) २. राज्य गुणवत्ता निरिक्षक- श्रेणी-२ (SQM Gr-II) (सेवानिवृत्त उपअभियंता) ३. वरीष्ठ राज्य गुणवत्ता निरिक्षक (SSQM) अशी त्रिस्तरीय गुणवत्ता नियंत्रण कार्यपध्दती निश्चित करण्यात आली आहे. राज्य गुणवत्ता निरिक्षक- श्रेणी-२ (SQM Gr-II) हे जिल्हा परिषदाकडील कामांची तपासणी करतात राज्य गुणवत्ता निरीक्षक (SQM) यांच्या मार्फत करण्यात आलेल्या तपासणी

अहवालांची छाननी, संकलन राज्य गुणवत्ता समन्वयक (SQC) यांच्यामार्फत करण्यात येते. प्रधानमंत्री ग्राम सडक योजनेसाठी रस्त्याच्या गुणवत्ता तपासणीसाठी असलेल्या राष्ट्रीय गुणवत्ता निरिक्षक (NQM) या पदाच्या धर्तीवर मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेतील रस्त्याच्या गुणवत्ता तपासणीसाठी वरीष्ठ राज्य गुणवत्ता निरिक्षक (SSQM) हे पद तयार करण्यात आले आहे. राष्ट्रीय गुणवत्ता निरिक्षक पदासाठी ६७ वर्षे इतकी वयोमर्यादा असून वरिष्ठ राज्य गुणवत्ता निरिक्षक या पदासाठी ७० वर्षे इतकी वयोमर्यादा होती. राष्ट्रीय गुणवत्ता निरिक्षक या पदाच्या धर्तीवर वरिष्ठ राज्य गुणवत्ता निरिक्षक यांची वयोमर्यादा ६७ वर्षे करण्याबाबत राज्य गुणवत्ता समन्वयक, प्रमंग्रासयो, पुणे यांनी शिफारस केली आहे. या अनुषंगाने वरीष्ठ राज्य गुणवत्ता निरिक्षक (SSQM) व राज्य गुणवत्ता निरिक्षक- श्रेणी-२ (SQM Gr-II) यांच्या वयोमर्यादेत बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक:-**

राज्य गुणवत्ता समन्वयक, पुणे यांनी संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये नमूद केलेली कारणे विचारात घेता, राष्ट्रीय गुणवत्ता निरिक्षक (NQM) या पदाप्रमाणे वरीष्ठ राज्य गुणवत्ता निरिक्षक (SSQM) या पदासाठी ६७ वर्षे इतकी वयोमर्यादा करण्यात येत आहे. तसेच राज्य गुणवत्ता निरिक्षक-श्रेणी-२ (SQM Gr-II) यांची वयोमर्यादाही ६७ वर्षे इतकी करण्यात येत आहे.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७२७१८३७२९९९२० असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PATIL PRASHANT VINAYAKRAO

Digitally signed by PATIL PRASHANT VINAYAKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, pseudonym=52A6F57E50F36E268CFB25B4597BB272A28E8E8C, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PATIL PRASHANT VINAYAKRAO
Date: 2023.07.28 11:26:47 +05'30'

**(प्रशांत पाटील)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत माहितीसाठी अग्रेषित-:**

१. प्रधान सचिव यांचे स्वीय सहायक, ग्राम विकास व पंचायत राज, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव (मुमंग्रासयो) यांचे स्वीय सहायक, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंत्रालय,

मुंबई.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषद.

४. मुख्य अभियंता, प्रमंग्रासयो, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.

५. वित्तीय नियंत्रक, प्रमंग्रासयो, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.

६. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषद.

७. राज्य गुणवत्ता समन्वयक, प्रमंग्रासयो, पुणे.

८. अधीक्षक अभियंता,प्रमंग्रासयो, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था.

९. कार्यकारी अभियंता, प्रमंग्रासयो, सर्व.

१०.निवडनस्ती, बांधकाम-२ .